**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची ठाणे येथील जागा ठाणे महानगरपालिकेला क्लस्टर डेव्हलपमेंट, सॅटीस प्रकल्प व पार्किंग प्लाझाकरीता हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-१११९/प्र.क्र.६९/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख : ०७ मार्च, २०२४

वाचा :-

१. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांकः डब्ल्युएसबी-१०७८/६२०/युडी-२३, दि३०.१०.१९७९
३. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांकः जमीन ०४/२००६/प्र.क्र.३५/ज-०१, दि.८.०९.२००८
४. मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेली दिनांक २८.०७.२०२२ ची बैठक
५. प्रशासक तथा आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचा ठराव क्र.४४७, दि.२६.१२.२०२३
६. संचालक मंडळ, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचा दिनांक ९.०१.२०२४ च्या १५५ व्या बैठकीतील ठराव बाब क्र.२०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. या अधिनियमाच्या नियम १८ अन्वये महाराष्ट्र पर्यावरण सेवेच्या प्रयोजनार्थ राज्य शासनाने तत्कालीन महाराष्ट्र पर्यावरण व मलनिस्सारण मंडळास वर्ग केलेल्या मालमत्ताचे सर्वाधिकार प्राधिकरणास विहित केले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे हस्तांतरीत झालेल्या सर्व शासकीय जागांवर प्राधिकरणाचा मालकी हक्क स्थापित झाला आहे. ठाणे महानगरपालिकेमार्फत विविध विकास योजना राबविण्यासाठी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. २८.०७.२०२२ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये घेतलेले निर्णय पुढीलप्रमाणे आहेत -

अ) ठाणे (पश्चिम) येथील गडकरी रंगायतन शेजारील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची जागा ठाणे महानगरपालिकेस सार्वजनिक पार्किंग व्यवस्थेकरीता उपलब्ध करुन द्यावी. ठाणे महानगरपालिकेस हस्तांतरित करण्यात येणाऱ्या क्षेत्रापैकी १,५०० चौ.मी. इतके क्षेत्राचे सुविधा भूखंड ठाणे महानगरपालिका क्षेत्रात ठाणे महानगरपालिकेने उपलब्ध करुन द्यावे व त्यावर अस्तित्वातील कार्यालय व निवासी वापराच्या दीडपट बांधकाम विनामूल्य बांधून द्यावे.

ब) कोपरी, ठाणे (पूर्व) येथील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची जागा ठाणे महानगरपालिकेस क्लस्टर डेव्हलपमेंट करिता उपलब्ध करुन द्यावी. सदर जागेच्या मोबदल्यात बांधिव स्वरुपात त्याच परिसरात इतरत्र ठिकाणी अस्तित्वातील बांधकामाचे दिडपट बांधकाम करून द्यावे.

क) कोपरी, ठाणे (पूर्व) येथील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची जागा ठाणे महानगरपालिकेस सॅटीस प्रकल्पाकरिता उपलब्ध करुन देण्यात यावी. सदर जागेत बाधित होणाऱ्या बांधकामाच्या ऐवजी त्याच भूखंडावर उर्वरीत जागेत आहे त्या स्वरुपाचे व तेवढयाच बांधिव क्षेत्राचे बांधकाम ठाणे महानगरपालिकेने करून द्यावे.

उपरोक्त बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची ठाणे येथील जागा ठाणे महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असून त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय:-

ठाणे महानगरपालिका हद्दीतील डॉ. मुसा रोड, गडकरी रंगायतन शेजारी असलेल्या मौजे ठाणे टिका नं.४. सि.स.नं. ८० पैकी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचा एकूण २१९३.३७ चौ. मी. एवढ्या आकाराचा भूखंड अस्तित्वातील बांधकामासह सार्वजनिक पार्किंग व्यवस्थेकरीता महसूल

विभागामार्फत ठाणे महानगरपालिकेस हस्तांतरीत करुन देण्यास परिच्छेद (३), (४) व (५) येथील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. ठाणे (पूर्व) येथील मौजे कोपरी सि.स.नं. १०२५ (पै) येथील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मालकीच्या व ताब्यातील एकूण ३,७२६.०० चौ.मी. एवढ्या क्षेत्रफळाचा भूखंड क्लस्टर डेव्हलपमेंट व सॅटीस प्रकल्पाकरीता महसूल विभागामार्फत ठाणे महानगरपालिकेस हस्तांतरीत करुन देण्यास परिच्छेद (३), (४) व (५) येथील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त नमूद भूखंडाच्या बदल्यात ठाणे महानगरपालिकेने मौजे बाळकुम येथील स.क्र.९९, १००, १०१ व १० या भूखंडावरील ठाणे महानगरपालिका मालकीच्या सुविधा भूखंडापैकी ६७५७.७३ चौ.मी क्षेत्राचा सुविधा भूखंड महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला पर्यायी भूखंड म्हणून विनामूल्य विहित पद्धतीने कायमस्वरुपी हस्तांतरित करावा.

४. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून ठाणे महानगरपालिकेकडे हस्तांतरीत होणाऱ्या सध्याच्या जागेवर एकूण २५४५.२२ चौ. मी. इतके बांधकाम क्षेत्र आहे. ठाणे महानगरपालिकेकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला मौजे बाळकुम येथे नव्याने हस्तांतरीत होणाऱ्या सुविधा भूखंडावर सध्याच्या जागेवरील एकूण २५४५.२२ चौ. मी. इतक्या बांधकाम क्षेत्राच्या दीडपट म्हणजे एकूण ३८१७.८३ चौ. मी. इतके बांधकाम ठाणे महानगरपालिकेने प्राधिकरणाला विनामोबदला करुन द्यावे.

५. मौजे बाळकुम येथील नवीन जागेवर महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकरीता (कार्यालय व निवास) नवीन बांधकाम होईपर्यंत पर्यायी व्यवस्था म्हणून ठाणे महानगरपालिकेने विनामूल्य बांधीव जागा उपलब्ध करुन द्यावी. सदर विनामूल्य बांधीव जागा उपलब्ध होईपर्यंत प्राधिकरणाने, तात्पुरत्या स्वरुपात, त्यांच्याकडील अन्य जागेचा वापर करावा.

६. महसूल व वन विभागाचा अनौ. संदर्भ क्र.३०२, दिनांक २१.०३.२०२३ अन्वये प्राप्त पूर्वसहमतीने तसेच नगर विकास विभागाचा अनौ. संदर्भ क्र.ठामपा-२१२३/अनौ.३१/नवि-२३, दिनांक १०.१०.२०२३ अन्वये प्राप्त अभिप्रायांनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१७३१३७२५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2024.03.07 17:45:27 +05'30'

**(गणेश पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, जी. टी. रुग्णालय संकुल, मुंबई.
विभागीय आयुक्त, सर्व
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
जिल्हाधिकारी, ठाणे.
निवडनस्ती (पापु-२३)